**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) या पदावर सरळसेवेने नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः भरती-२०१८/प्र.क्र.३४६/सेवा-३,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२०.**

**संदर्भ** : १) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक: एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/ कार्या- १२, दि.२८/०४/२०१५, दि.१६/०७/२०१५, दि.१५/०६/२०१७ व दि.१२/०४/२०१८.
२) अधिक्षक अभियंता, मुंबई (सा.बां.) मंडळ, मुंबई यांचे जा.क्र.अअ(मुं)परिमंडळ/ का-७/भरती प्रक्रीया २०१९/६५५०, दि.२७/०८/२०१९.

**शासन निर्णय**

कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) या संवर्गातील राज्य स्तरीय रिक्त पदे नामनिर्देशनान्वये भरण्यासाठी सन २०१९ च्या स्पर्धात्मक परीक्षेच्या गुणवत्तेनुसार अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई या कार्यालयाने एकूण ४०५ उमेदवारांची शिफारस केली होती. सदर ४०५ उमेदवारांपैकी ३०० व ७० उमेदवारांना या विभागाच्या समक्रमांकाच्या अनुक्रमे दि.११/०७/२०१९ व १६/०८/२०१९ च्या शासन निर्णयांन्वये कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) या पदावर पदस्थापना देण्यात आली आहे. उपरोक्त ४०५ उमेदवारांपैकी उर्वरित ३५ उमेदवारांना पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांनी केलेल्या शिफारशीनुसार गुणवत्तेनुसार उपरोक्त पात्र उमेदवारांनी साक्षांकन नमुना व नियुक्तीविषयक अन्य आवश्यक कागदपत्रे सादर केली होती. त्यानुषंगाने सोबत जोडलेल्या **प्रपत्र-अ** मधील नियुक्तीस पात्र ठरलेल्या ३५ उमेदवारांची सार्वजनिक बांधकाम विभागात "कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित)" या पदावर ते रुजू होतील त्या दिनांकापासून, वेतनस्तर एस-१४, रुपये ३८६००-१२२८०० या वेतनश्रेणीत, त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या महसुली विभागातील जिल्हयात/सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभागांतर्गत नियुक्ती करण्यात येत आहे.

३. **प्रपत्र-अ** मधील उमेदवारांना 'महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदावर सरळसेवेने नियुक्तीसाठी विभागीय संवर्ग संरचना व विभागीय संवर्ग वाटप नियमावली' क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या.१२, दिनांक २८/०४/२०१५, दि.१६/०७/२०१५, दिनांक १५/०६/२०१७ व दिनांक १२/०४/२०१८ यामधील तरतुदी लागू असतील. त्यानुसार **प्रपत्र-अ** मध्ये दर्शविलेल्या उमेदवारांची त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या महसूली विभागात पदस्थापना करण्यात येत आहे. सदर उमेदवारांची सार्वजनिक बांधकाम विभागातील पदस्थापना ही अंतिम असून त्यात बदल होणार नाही.

४. संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांनी **प्रपत्र-अ** मधील उमेदवारांच्या सविस्तर नियुक्तीचे आदेश एकत्रितरित्या या आदेशाच्या दिनांकापासून ३ दिवसांच्या आत निर्गमित करुन सदर सविस्तर नियुक्ती आदेशाची प्रत शासनास ई-मेलद्वारे त्याच दिवशी पाठवावी. संबंधित मुख्य अभियंता यांनी सविस्तर नियुक्तीचे आदेश निर्गमित करतेवेळी, संबंधित उमेदवारांच्या नावासमोर दर्शविलेल्या महसूली विभागातील जिल्हयात कोणताही बदल न करता उमेदवारांना त्याच जिल्हयात नियुक्ती देण्याची कटाक्षाने दक्षता घ्यावी. अन्य जिल्हयात नियुक्ती झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र होतील, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

संबंधित मुख्य अभियंता यांनी सविस्तर नियुक्ती देताना आदिवासी व नक्षलग्रस्त क्षेत्रातील रिक्त असलेली पदे प्राथम्याने भरावीत.

मुख्य अभियंता यांनी सविस्तर नियुक्तीचे आदेश निर्गमित केल्यानंतर संबंधित उमेदवारांनी पदस्थापनेच्या ठिकाणी विहीत कालावधीत रुजू होणे बंधनकारक आहे.

५. "कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित)" या पदावर उमेदवारांची करण्यात आलेली नियुक्ती ही, या विभागातील "कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित)" या पदाच्या सेवाभरती नियमातील तरतुदीनुसार भरतीसाठी उपलब्ध असलेल्या रिक्त पदावर खालील विहित अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे:-

(१) **प्रपत्र-अ** मधील उमेदवारांनी महाराष्ट्र शासनाच्या सेवेत सविस्तर नियुक्ती मिळण्यासाठी संबंधित मुख्य अभियंता यांच्याकडे हे आदेश निर्गमित झाल्याच्या तारखेपासून एक महिन्याच्या आत प्रत्यक्ष संपर्क साधावा व सेवेत रुजू व्हावे. अन्यथा, एक महिन्यानंतर सदर नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. कार्यालय प्रमुखांनी एक महिन्यानंतर रुजू होणाऱ्या उमेदवारास रुजू करुन घेवू नये.

(२) एखाद्या उमेदवारास विहित कालावधीत अपरिहार्य, उचित कारणास्तव रुजू होण्यासाठी मुदतवाढ हवी असल्यास त्या उमेदवारांनी सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १० दिवसांच्या आत अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना मुदतवाढीसाठी अर्ज सादर करावा. तद्नंतर प्राप्त झालेले अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत. उचित कारणास्तव विहित कालावधीत मुदतवाढीसाठी अर्ज करणाऱ्या उमेदवारांना मुदतवाढ देण्याचा/ नाकारण्याचा अंतिम निर्णय शासनाचा राहील.

(३) जे उमेदवार या शासन निर्णयाच्या तारखेपासून एक महिन्याच्या आत हजर होणार नाहीत अथवा त्यांचेकडून यासंबंधात काही सूचना प्राप्त झाली नाही तर ही नियुक्ती त्यांना स्वीकृत नाही असे समजून उमेदवारांच्या नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. या बाबतचा अहवाल संबंधित मुख्य अभियंता यांनी शासनाला दिनांक २०/०३/२०२० पर्यंत शासनास सादर करावा.

(४) संबंधित मुख्य अभियंता यांनी, **प्रपत्र-अ** मधील उमेदवारांना सार्वजनिक बांधकाम विभागात रुजू करुन घेण्यापूर्वी, जाहीरातीत नमूद केल्यानुसार वयोमर्यादेची तसेच शैक्षणिक व अन्य अटींची पुर्तता करणारी मूळ कागदपत्रे (वय, अधिवास, शैक्षणिक पात्रता, महिला आरक्षणानुसार विहीत केलेले प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र, अनाथ प्रमाणपत्र इ.) तपासून रुजू करुन घ्यावे.

(५) **प्रपत्र-अ** मधील उमेदवारांची ज्येष्ठता, शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही १०७६/१२, दिनांक २१/०६/१९८२ अन्वये विनियमित केलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियम, १९८२ मधील तरतुदीनुसार गुणवत्ता क्रमांकानुसार निश्चित करण्यात येईल. त्यामुळे नियुक्तीच्या आदेशानुसार एक महिन्याच्या आत सेवेत रुजू न होणाऱ्या उमेदवारांना सेवा ज्येष्ठता गमवावी लागेल व त्यांची ज्येष्ठता ते ज्या दिनांकास शासन सेवेत रुजू होतील, त्या दिनांकास निश्चित करण्यात येईल.

(६) मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर नियुक्त केलेल्या **प्रपत्र-अ** मधील उमेदवारांची प्रचलित नियमातील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत आहे. मागासवर्गीय उमेदवारांनी जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र शासनास व संबंधित उमेदवारांची नियुक्ती करण्यात आलेल्या कार्यालयास सादर करणे आवश्यक राहील. त्यानुसार संबंधित उमेदवारांच्या मुळ सेवापुस्तकात नोंद घेण्याची कार्यवाही संबंधित कार्यालय प्रमुखांनी करावी.

मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर (अ.जा., अ.ज., वि.जा., भ.ज.(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड), वि.मा.प्र., इ.मा.व. तसेच एस.ई.बी.सी.) नियुक्ती करण्यात आलेल्या मागासवर्गीय उमेदवारांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नसल्यास, त्यांनी या आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या आत जात प्रमाणपत्राची वैधता, जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडून करुन घेणे आवश्यक राहील. नियुक्ती देण्यात आलेल्या कार्यालयाने संबंधित मागसवर्गीय उमेदवारांच्या जात वैधता प्रमाणपत्राच्या अनुषंगाने आवश्यक ती कागदपत्रे जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठविण्याची कार्यवाही करावी. विहित मुदतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्यास संबंधित उमेदवारांच्या सेवा प्रचलित नियमानुसार समाप्त करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

(७) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय दिनांक २५/०५/२००१ मधील तरतुदीनुसार, खुला (महिला) आणि मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या उमेदवारांची, “महिलांसाठी उन्नत व प्रगत व्यक्ती गट (क्रिमीलेअर) यामध्ये मोडत नसल्याबाबतचे प्रमाणपत्र” (अलिकडचे/ नवीनतम मूळ नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र) ची सांक्षाकित प्रत तपासणीसाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेकडे पाठविणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने खुला (महिला) व मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या महिला उमेदवारांचे नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र दोन प्रतीत शासनास पाठविण्याची कार्यवाही या आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत संबंधित मुख्य अभियंता यांनी करावी.

खुला (महिला) आणि मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या महिला उमेदवारांची नियुक्ती सदर तपासणी अहवालाच्या अधिन राहून करण्यात येत आहे. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेकडून प्राप्त अहवालानुसार महिला उमेदवार अपात्र ठरत असल्यास त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

(८) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, दिनांक ०१/०७/२०१६ मधील तरतुदीनुसार, खेळाडू प्रवर्गातून निवड झालेल्या उमेदवारांना नियुक्ती देण्यात येत आहे. सदर तरतुदींची पुर्तता होत नसल्यास संबंधित उमेदवाराची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

(९) **प्रपत्र-अ** मधील उमेदवारांनी हिन्दी व मराठी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा सदर भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर यासंबंधी असलेल्या नियमानुसार भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. भाषा परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास त्यांची वेतनवाढ प्रचलित नियमाप्रमाणे रोखून ठेवण्यात येईल.

(१०) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक ०७/०८/२००१ अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी/ वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९/०३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून २ (दोन) वर्षांच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहित मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

(११) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक: अंनियो-१००६/८७/सेवा-४, दिनांक १२/०१/२००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू होईल. वित्त विभागाच्या उपरोक्त दिनांक १२/०१/२००७ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल अशा शासकीय कर्मचाऱ्यास नविन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू होईल.

(१२) **प्रपत्र-अ** मधील उमेदवारांनी कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) गट-ब (अराजपत्रित) या पदासाठी विहित केलेली व्यावसायिक परीक्षा विहित कालावधीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

(१३) **प्रपत्र-अ** मधील उमेदवाराचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार निश्चित करण्यात यावे.

(१४) सदर नियुक्ती, उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्राच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. उमेदवारांनी सादर केलेली प्रमाणपत्रे तसेच सांक्षाकन नमुन्यात नमूद केलेली माहिती, नियुक्तीनंतर खोटी अथवा बनावट आढळल्यास, सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

(१५) **प्रपत्र-अ** मधील उमेदवारांच्या सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार असेल.

(१६) आवश्यकता भासल्यास **प्रपत्र-अ** मधील उमेदवारांना भारताच्या संरक्षण सेवेतील पदावर किंवा भारताच्या संरक्षणाशी निगडीत असलेल्या कुठल्याही पदावर देशात किंवा परदेशात प्रशिक्षणाचा कालावधी धरुन चार वर्षापेक्षा कमी नसणाऱ्या कालावधीसाठी भारत सरकार ठरवेल त्या शर्तीवर सेवा करावी लागेल.

परंतु,

(अ) त्यांच्या नियुक्तीनंतर १० वर्षांचा कालावधी संपल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही

किंवा,

(ब) सर्वसाधारणपणे त्यांच्या वयाची ४० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही.

(१७) **प्रपत्र-अ** मधील उमेदवार सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असल्यास, त्याला शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०९२/ १०३३/ प्र.क्र.३३/ ९२/८, दिनांक ०२/१२/१९९७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ नोटीस किंवा एक महिन्याचे मूळ वेतन देणे आवश्यक राहील. मात्र, गैरशिस्त, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी वरीलप्रमाणे नोटीस देण्याचे बंधन शासनावर असणार नाही.

(१८) **प्रपत्र-अ** मधील उमेदवारांना महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणासंबंधी, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दिनांक २३/०९/२०११ मधील परिच्छेद सहा येथील तरतुदीनुसार दिर्घ कालावधीचे व विदेशी प्रशिक्षणापूर्वी प्रशिक्षणार्थीला सक्षम प्राधिकाऱ्याबरोबर बंधपत्र लिहून द्यावे लागेल व त्याप्रमाणे नंतर प्रशिक्षणार्थी नोकरी सोडत असेल तर प्रशिक्षणावर खर्च झालेली रक्कम सदर प्रशिक्षणार्थीकडून वसूल करून संबंधित प्राधिकाऱ्याला शासनाकडे जमा करावी लागेल. याबाबतचे दर शासन निश्चित करेल. त्यानुसार प्रत्येक प्रशिक्षणार्थीला महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी (मेटा), नाशिक येथे प्रशिक्षणासाठी रुजू होण्यापूर्वी मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी (मेटा), नाशिक यांच्याकडे व संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडे विहित बंधपत्र भरुन सादर करणे बंधनकारक राहील.

**उपरोक्त वसूली केल्याशिवाय प्रशिक्षणार्थींचा राजीनामा क्षेत्रिय स्तरावरुन स्विकारण्यात येऊ नये.** त्यानुसार प्रत्येक प्रशिक्षणार्थीला महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी(मेटा), नाशिक येथे रूजू होण्यापूर्वी मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांच्याकडे व संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडे विहित बंधपत्र भरून सादर करणे बंधनकारक राहील.

(१९) प्रशिक्षणादरम्यान सर्व प्रशिक्षणार्थीकडून प्रबोधिनीच्या प्रशिक्षणबाबतच्या नियमांचे व शिस्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. त्यांच्याकडून नियमभंग झाल्यास प्रबोधिनीकडून त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

(२०) **प्रपत्र अ** मधील उमेदवारांना वैद्यकीय तपासणी अहवाल शासनास सादर करण्याच्या अटींच्या अधीन राहून तात्पुरते नियुक्त करण्यात येत आहे. संबंधित मुख्य अभियंता यांनी उमेदवारांच्या वैद्यकीय तपासणी अहवालाची नोंद त्यांच्या मुळ सेवा पुस्तकात घेवून त्याची एक प्रत शासनास या आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत सादर करावी.

(२१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक चारित्र्य-२११७/प्र.क्र.४८३/२०१७/१६-अ, दिनांक २८/०८/२०१७ अन्वये संबंधित मुख्य अभियंता यांनी उमेदवारांचे चारित्र्य पडताळणी अहवालाची नोंद त्यांच्या मुळ सेवा पुस्तकात घेवून त्याची एक प्रत शासनास या आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत सादर करावी. उमेदवारांनी साक्षांकन नमुन्यात सादर केलेली माहिती असत्य असल्याचे आढळून आल्यास तात्पुरते नियुक्ती आदेश रद्दबादल करुन भारतीय दंडसंहितेनुसार फौजदारी कारवाई करुन सदर उमेदवारांना शासन सेवेत कायमस्वरुपी अपात्र ठरविण्यात येईल.

(२२) सदर नियुक्ती आदेश, मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुमती याचिका (डायरी) क्र.२३२२८/२०१९ व अन्य- श्री.संजीत शुक्ला व इतर

विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर यावर देण्यात येणाऱ्या अंतिम निकालाच्या अधिन राहून, निर्गमित करण्यात येत आहेत.

(२३) सदर नियुक्ती आदेश, मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल करण्यात आलेल्या रिट याचिका क्र.१०५४७/२०१९ श्री.रंजित बिरंगे व इतर विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर यावर देण्यात येणाऱ्या अंतिम निकालाच्या अधिन राहून, निर्गमित करण्यात येत आहेत.

६. **प्रपत्र-अ** मधील उमेदवार ज्या दिवशी रुजू होतील त्या दिवसापासून नियमाप्रमाणे त्यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यात यावेत व बदली झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्याकडे पाठवून विभाग प्रमुखांनी याबाबत संबंधित मुख्य अभियंता/ अधिक्षक अभियंता व शासनास कळवावे.

७. **प्रपत्र-अ** मधील उमेदवार जलसंपदा विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग अथवा शासनाच्या इतर विभागात कार्यरत असल्यास, अशा उमेदवारांनी संबंधित विभागाच्या नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांना नेमणूकीचे ठिकाणी रुजू होण्याकरीता कार्यमुक्त केलेल्या आदेशाची प्रत सादर केल्यानंतर संबंधित मुख्य अभियंता/अधिक्षक अभियंता किंवा कार्यालय प्रमुख यांनी उमेदवारांना रुजू करुन घ्यावे.

८. **प्रपत्र-अ** मधील उमेदवारांनी, विशिष्ट ठिकाणी पदस्थापना/ नियुक्ती मिळविण्यासाठी खासदार/आमदार/ लोकप्रतिनिधी/ खाजगी व्यक्ती किंवा संघटना यांचे मार्फत दडपण/दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित उमेदवारांविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील तरतुदींनुसार शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१५१५४८०३५९१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VAISHALI MANISH SULE

Digitally signed by VAISHALI MANISH SULE
DN: CN = VAISHALI MANISH SULE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC WORKS
Date: 2020.02.15 15:50:54 +05'30'

**(वैशाली सुळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल १/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२, लेखापरिक्षा, महाराष्ट्र मुंबई/नागपूर,
३. मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. अपर मुख्य सचिव (सा.बां.वि.), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. सचिव (बांधकामे), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. सचिव (रस्ते), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. सह सचिव (सेवा)/उप सचिव (संनि), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
मुंबई/कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/ नागपूर,
११.मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई,
१२.मुख्य अभियंता (बांधकाम व्यवस्थापन कक्ष), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३.मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक,
१४.अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ (सर्व),
१५.कार्यासन अधिकारी (आस्था-१/आस्था-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६.संबंधित उमेदवार, (सोबत जोडलेल्या उमेदवारांच्या निवासी पत्त्यांच्या यादीनुसार- नोंदणी पोच देय डाकेने तसेच ई-मेलद्वारे)
- संबंधित उमेदवारांनी त्यांना नियुक्ती दिलेल्या संबंधित मुख्य अभियंता यांचे कार्यालयात हजर होण्याकरिता संपर्क साधावा.
१७.कार्यासन-सेवा-३, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती).

प्रपत्र-अ

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.भरती-२०१८/प्र.क्र.३४६/सेवा-३, दि.१५ फेब्रुवारी, २०२० चे सहपत्र

कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) या पदावर सरळसेवेने पदस्थापना

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव | उमेदवाराचा प्रवर्ग | नियुक्तीचा प्रवर्ग | विभाग पसंती | वाटप करण्यात आलेला महसुली विभाग | संबंधित मुख्य अभियंता | नियुक्तीसाठी वाटप करण्यात आलेला जिल्हा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | नरेंद्र मोहनराव नव्हाते | खुला | खुला | औरंगाबाद | औरंगाबाद | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., औरंगाबाद | नांदेड |
| २ | रविकुमार लालुराम आश्रमा | खुला | खुला | अमरावती | अमरावती | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., अमरावती | बुलढाणा |
| ३ | कृष्णा अशोक गोरे | खुला | खुला | पुणे | पुणे | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., पुणे | सोलापूर |
| ४ | पवन शिवाजी शेरसांडे | खुला | खुला | औरंगाबाद | औरंगाबाद | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., औरंगाबाद | जालना |
| ५ | दिपक सदाशिव फड | भ.ज.(ड) | खुला | नाशिक | नाशिक | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., नाशिक | नंदुरबार |
| ६ | सोमेश विजय शर्मा | खुला | खुला | अमरावती | अमरावती | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., अमरावती | यवतमाळ |
| ७ | मोहम्मद खिझर हबीबुर रेहमान सय्यद | खुला | खुला | पुणे | पुणे | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., पुणे | सातारा |
| ८ | देवेंद्र केदारनाथ यादव | खुला | खुला | अमरावती | अमरावती | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., अमरावती | अमरावती |
| ९ | मोहम्मद शफीउद्दीन अदील | खुला | खुला | औरंगाबाद | नागपूर | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., नागपूर | गोंदिया |
| १० | विनोद भिमराव खाडे | भ.ज.(ड) | खुला | औरंगाबाद | कोकण-१ | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., कोकण | पालघर |
| ११ | रोहन रमेश पांचाळ | खुला | खुला | कोकण-२ | कोकण-२ | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., मुंबई | मुंबई उपनगर |
| १२ | शेख मोहम्मद शेख फकिरसाब | खुला | खुला | औरंगाबाद | नाशिक | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., नाशिक | धुळे |
| १३ | केतन अंबादास साखरे | खुला | खुला | औरंगाबाद | कोकण-२ | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., मुंबई | मुंबई शहर |
| १४ | विशाल गणप्पा तुप्पद | खुला | खुला | औरंगाबाद | नागपूर | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., नागपूर | वर्धा |
| १५ | चंदू यल्लाप्पा गुरव | खुला | खुला | पुणे | पुणे | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., पुणे | सांगली |
| १६ | गौरव राजेंद्र सोनावणे | खुला | खुला | नाशिक | नाशिक | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., नाशिक | अहमदनगर |
| १७ | सौरभ शिवशंकर बनसोडे | खुला | खुला | कोकण-२ | कोकण-२ | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., मुंबई | मुंबई उपनगर |
| १८ | बालाजी लक्ष्मण दहिफळे | खुला | खुला | नाशिक | नाशिक | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., नाशिक | जळगाव |
| १९ | अक्षय रविंद्र बोरसे | खुला | खुला | औरंगाबाद | कोकण-१ | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., कोकण | रत्नागिरी |
| २० | संजीवनी सुदर्शन बिरादार | खुला | खुला (महिला) | पुणे | पुणे | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., पुणे | कोल्हापूर |
| २१ | युतिका रमण केणी | खुला | खुला (महिला) | कोकण-१ | कोकण-१ | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., कोकण | सिंधुदूर्ग |
| २२ | स्वरदा मुकुंद दिक्षीत | खुला | खुला (महिला) | नाशिक | नाशिक | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., नाशिक | नाशिक |
| २३ | सारिका शंकरराव जाधव | खुला | खुला (महिला) | पुणे | पुणे | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., पुणे | सोलापूर |
| २४ | निकिता संजय पवार | खुला | खुला (महिला) | पुणे | पुणे | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., पुणे | सातारा |

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव | उमेदवाराचा प्रवर्ग | नियुक्तीचा प्रवर्ग | विभाग पसंती | वाटप करण्यात आलेला महसुली विभाग | संबंधित मुख्य अभियंता | नियुक्तीसाठी वाटप करण्यात आलेला जिल्हा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| २५ | आकाश मनोहर आगरकर | भ.ज.(क) | भ.ज.(क) | अमरावती | अमरावती | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., अमरावती | अकोला |
| २६ | निखिल मन्साराम साळुंखे | इ.मा.व. | इ.मा.व. | नाशिक | नाशिक | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., नाशिक | नंदुरबार |
| २७ | पियुष अनिल काळे | इ.मा.व. | इ.मा.व. | अमरावती | अमरावती | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., अमरावती | यवतमाळ |
| २८ | जितूल रमेश चव्हाण | अ.जा. | अ.जा. | अमरावती | अमरावती | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., अमरावती | अमरावती |
| २९ | सानु साधु सोनकांबळे | अ.जा. | अ.जा. | पुणे | पुणे | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., पुणे | कोल्हापूर |
| ३० | विवेक दिलीप थोरकर | एस.इ.बी.सी. | एस.इ.बी.सी. | नाशिक | नाशिक | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., नाशिक | धुळे |
| ३१ | मयुर मारूती बाऊस्कर | एस.इ.बी.सी. | एस.इ.बी.सी. | पुणे | नाशिक | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., नाशिक | अहमदनगर |
| ३२ | राहुल मधुकर आडोळे | एस.इ.बी.सी. | एस.इ.बी.सी. | पुणे | नागपूर | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., नागपूर | नागपूर |
| ३३ | जयराम मारुती जाधव | एस.इ.बी.सी. | एस.इ.बी.सी. | पुणे | नाशिक | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., नाशिक | जळगाव |
| ३४ | मिताली विजय भोगले | एस.इ.बी.सी. | एस.इ.बी.सी. (महिला) | कोकण-२ | कोकण-२ | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., मुंबई | मुंबई शहर |
| ३५ | तुकाराम वसंता भिसे | अ.ज. | अ.ज. | अमरावती | नाशिक | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., नाशिक | अहमदनगर |

*******************************************